**<u>एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-६</u> राज्यसेवा (मुख्य) परिक्षा - २०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी, गट ब संवर्गातील उमेदवारांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाकरिता विभागात हजर करून घेण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअस १३२०/प्र.क्र.२२(२)/१४ब**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १९ मार्च, २०२०

<u>संदर्भ</u> - १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.कअस - १३१९/प्र.क्र.६९/१४-ब, दिनांक १४.११.२०१९
३) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन - २०१९/प्र.क्र.५७/सीपीटीपी-ब, दिनांक १७.०१.२०२०

**कार्यालयीन आदेश**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक २०.०१.२०१४ अन्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणा-या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येणार आहे.

२. त्याअनुषंगाने एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम -६ अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने राज्यसेवा (मुख्य) परीक्षा - २०१८ द्वारे मंत्रालयीन कक्ष अधिकारी पदासाठी शिफारस केलेल्या पुढील तक्त्यातील १८ उमेदवारांची कक्ष अधिकारी, गट-ब या पदावर रकाना क्र.४ मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकापासून दोन वर्षांच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकारी म्हणून संदर्भाधीन क्र. ३ च्या आदेशान्वये तात्पुरती नियुक्ती देण्यात आली आहे.

| अ.क्र. | परिविक्षाधीन कक्ष अधिकाऱ्यांचे नाव | राज्यसेवा परीक्षा २०१८ गुणवत्ता क्र. | रूजू दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. शिवराज शहाजी डोंगरे | १ | ०२.१०.२०१९ |
| २. | श्री. शिरीष सर्जेराव पाटील | २ | ०२.१०.२०१९ |
| ३. | श्री.सुरज सुरेश बेलेकर | ३ | ०२.१०.२०१९ |
| ४. | श्री. आनंदा जनार्धन गोरे | ५ | ०२.१०.२०१९ |
| ५. | श्री. प्रसाद संजय स्वामी | ६ | ०२.१०.२०१९ |

| अ.क्र. | परिविक्षाधीन कक्ष अधिकाऱ्यांचे नाव | राज्यसेवा परीक्षा २०१८ गुणवत्ता क्र. | रूजू दिनांक |
|---|---|---|---|
| ६. | श्री. महेश सरला जाधव | ७ | ०२.१०.२०१९ |
| ७. | श्री. सौरभ नरेंद्र पवार | १० | ०२.१०.२०१९ |
| ८. | श्रीमती रोहिणी ज्ञानदेव बानकर | १४ | ०५.१०.२०१९ |
| ९. | श्रीमती अनुजा शाम लोंढे | १६ | ०२.१०.२०१९ |
| १०. | श्रीमती चित्रा रविन्द्र बिसेन | १७ | ०२.१०.२०१९ |
| ११. | श्री. साईप्रसाद दत्तागौड मुकदाडवार | १८ | ०२.१०.२०१९ |
| १२. | श्री. राम सुधाकर चौधरी | २० | ०२.१०.२०१९ |
| १३. | श्री. मोहनदास त्र्यंबक भुसारे | २१ | ०२.१०.२०१९ |
| १४. | श्री. आशिष वसंत आत्राम | २२ | ०३.१०.२०१९ |
| १५. | श्री. विरेंद्र श्रीहरी चौधरी | २३ | ०२.१०.२०१९ |
| १६. | श्री. साहेबराव धनराज भोये | २४ | ०२.१०.२०१९ |
| १७. | श्रीमती समृध्दी मनोहर आत्राम | २५ | ०३.१०.२०१९ |
| १८. | श्रीमती मृणाली रामसुराम काटेंगे | २६ | ०३.१०.२०१९ |

२. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामधील खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण टप्प्यामधील प्रशिक्षण संबंधित प्रशासकीय विभागाने द्यावयाचे आहे. त्यानुसार उपरोक्त १८ परिविक्षाधीन कक्ष अधिकारी दिनांक १६.०३.२०२० (म.पू.) पासून प्रशिक्षण कालावधीमधील खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाकरिता या विभागात हजर झाले आहेत. सदरहू परिविक्षाधीन कक्ष अधिका-यांना दिनांक १६.०३.२०२० (म.पू.) पासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशिक्षण कालावधीमधील खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाकरिता रूजू करून घेण्यात येत आहे.

१. प्रशिक्षणार्थींना खातेनिहाय जिल्हा संलग्नता टप्प्यामधील प्रशिक्षण घेणे आवश्यक राहिल.
२. प्रशिक्षण कालावधीमध्ये प्रशिक्षणार्थींची वर्तणूक समाधानकारक असावी.
३. परिविक्षाधीन कक्ष अधिका-यांना संदर्भाधीन क्र.३ येथील आदेशान्वये विहित केलेल्या परिविक्षाधीन कालावधीवरील नियुक्तीच्या अटी व शर्ती लागू राहतील.
४. वर नमूद केलेल्या शर्ती व्यतिरिक्त सर्वसाधारणपणे राज्यसेवा, गट-ब च्या अधिका-यांसाठी महाराष्ट्र शासनाने विहीत केलेले इतरही सेवा नियम या उमेदवारांना लागू असतील व त्या नियमाचे पालन करणे त्यांना बंधनकारक राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३१९१६०२३१०१०७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.03.19 16:05:06 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित परिविक्षाधीन कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२) संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर -४४२ ४१०.
३) उप सचिव (का.क्र.सीपीटीपी ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अवर सचिव, रोखशाखा (२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. (आवश्यक कार्यवाहीकरिता)
५) निवडनस्ती.